**आश्रमशाळेतील किशोरवयीन विद्यार्थी व शिक्षक यांना जीवन कौशल्य विषयक प्रशिक्षण देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.शाआशा-२०१५/प्र.क.३३६/का.१३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १० जानेवारी, २०१७.

**प्रस्तावना:**

देशाप्रमाणे महाराष्ट्र राज्यामध्ये आदिवासी समाज नेहमीच वंचित सामाजिक समूह म्हणून राहिला आहे. आदिवासी जनता गरिबी आणि कुपोषण तसेच भौगोलिकदृष्ट्या दूर आणि निकृष्ट दळणवळण यासारख्या अनेक कारणांमुळे सोयी-सुविधापासून वंचित राहिली आहे. आदिवासींमधील तीव्र कुपोषण त्यांची वाढ आणि विकासावर परिणाम करते. कुपोषित मुलांचा शारिरीक आणि मानसिक विकासही खुंटतो. त्याचप्रमाणे विवाहपूर्व आणि लहान वयात गरोदर होण्याचे प्रमाण आदिवासी समाजात जास्त दिसून येते. आदिवासी समाजाचा भगत आणि पारंपारिक उपायांवरील विश्वास तसेच प्राथमिक आरोग्य सुविधांपासूनचे अंतर, येण्या-जाण्यासाठीचा खर्च, रोजगाराचे नुकसान आणि औषधांचा खर्च अशा कारणांमुळे वैद्यकीय सुविधांचा वापर कमी होतो. महाराष्ट्र शासनाने आदिवासी समाजाचे आरोग्य आणि कल्याण यासाठी अनेक उपक्रम आणि कायदे आदिवासी भागात राबवले आहेत; ज्यामुळे सद्यस्थितीत सुधारणा दिसून येते, परंतु ही प्रकिया वेगवान करण्याची गरज आहे. कोणत्याही समाजातील पौगंडावस्थेतील मुले/मुली हा अत्यंत महत्वाचा घटक असतो. मुला-मुलींचे आरोग्य आणि कल्याण राज्याच्या संपूर्ण विकासासाठी अत्यावशक आहे. पौगंडावस्थेतील मुलांच्या शिक्षण, आरोग्य आणि विकासाच्या संधीमध्ये येणारे अडथळे दूर केल्याने महाराष्ट्राच्या औद्योगिकीकरणाला हातभार लागणार आहे, कारण सशक्त तरुण ही अर्थव्यवस्थेतील महत्वाची संसाधने आहेत. आदिवासी किशोरवयीन जिवन कौशल्य विकास कार्यक्रम हा आदिवासी समाजातील मुला-मुलींचा विकास घडवून संपूर्ण समाजामध्ये सामाजिक आणि आर्थिक बदल घडवण्यास मदत करेल. आदिवासी मुला-मुलींच्या संपूर्ण विकासासाठी त्यांना शिक्षण, पोषण, पाणी, स्वच्छता, कौशल्य आणि सबलीकरण याकडे लक्ष देणे गरजेचे आहे. मुलां-मुलींच्या गरजा, सद्यस्थिती आणि त्यांची असुरक्षितता समजून घेण्यासाठी विशिष्ट कार्यक्रम आणि सुविधा यांची गरज आहे. हे सर्व लक्षात घेता आदिवासी विकास विभाग, राजमाता जिजाऊ माता आणि बाल आरोग्य व पोषण मिशन मार्फत आश्रमशाळेतील मुले-मुलीं आणि शिक्षकांसाठी प्रशिक्षण कार्यक्रम तयार करण्यात आला आहे. सदर कार्यक्रम राबविण्यासाठी शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

**१.** युनिसेफच्या सहाय्याने राजमाता जिजाऊ माता आणि बाल आरोग्य आणि पोषण मिशन यांच्यामार्फत शासकीय आश्रमशाळा तसेच एकलव्य निवासी शाळेतील पौंगडावस्थेतील मुलां-मुलींना जिवन कौशल्य विषयक शिक्षण सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षात देण्यासाठी शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. **प्रशिक्षणाचा उद्देश:** आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना आरोग्य, पोषण, पाणी, स्वच्छता आणि जिवन कौशल्य इत्यादी विषयी योग्य ती माहिती देणे आहे. पौंगडावस्थेतील मुले व मुलींमध्ये माहिती, समुपदेशन, आरोग्यविषयक सूचना इत्यादी संदर्भात योग्य तो कौशल्य विकास घडवणे: ज्यामुळे त्यांच्या

समस्यांचे निराकरण त्यांना करता येईल. तसेच मुलांमध्ये आत्मविश्वास वाढवणे आणि त्यांना आत्मनिर्भर करणे हा देखील प्रशिक्षणाचा उद्देश आहे.

३. **प्रशिक्षण वर्ग:** या प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत खालील सर्व गटांना प्रशिक्षण देण्यात येईल.

(१) राज्य स्तरावर मास्टर ट्रेनर्स.

(२) आश्रमशाळा आणि एकलव्य शाळेचे शिक्षक/पुरुष व महिला अधिक्षक.

(३) शासकीय आश्रमशाळेतील व एकलव्य निवासी शाळेतील पौगंडावस्थेतील मुले-मुली.

मास्टर ट्रेनर्सना राज्य पातळीवरून प्रशिक्षण देण्यात येईल. राज्यातील ५२९ शासकीय आश्रमशाळा आणि १४ एकलव्य निवासी शाळांमधील शिक्षकांना मास्टर ट्रेनर्स यांच्यामार्फत प्रशिक्षण देण्यात येईल. त्यानंतर प्रशिक्षित शिक्षकांच्या मार्फत सहावी ते बारावी पर्यंतच्या मुलां-मुलींना साप्ताहिक सत्रामध्ये प्रशिक्षण देण्यात येईल.

४. **प्रशिक्षण पद्धती:** प्रशिक्षणाची पद्धत ही पारंपारिक पद्धतीपेक्षा वेगळी असेल. संवादाच्या माध्यमातून आणि पौगंडावस्थेतील मुलां-मुलींना योग्य अशा पद्धतीने त्यांच्या समस्या समजून देण्यात येतील. प्रशिक्षणात सहभागी होणा-यांची संख्या आणि त्याचा प्रसार लक्षात घेता प्रशिक्षण ठराविक सत्रांमध्ये देणे जास्त योग्य आणि परिणामकारक ठरते. सबब सदर प्रशिक्षण तीन सत्रांमध्ये देण्यात येणार आहे.

५. **प्रशिक्षण कार्यपद्धती:** सदर प्रशिक्षण कार्यक्रमाची पद्धती खालील प्रमाणे असेल;

**अ) मास्टर ट्रेनर प्रशिक्षण**

(१) राज्य पातळीवरील गटामध्ये (State Resource Group) १० प्रशिक्षण देणारे आरोग्य आणि पोषण तज्ञ असतील, जे मास्टर ट्रेनर्सना प्रशिक्षण देतील.

(२) ३० मास्टर ट्रेनर्सचा एक गट तयार करण्यात येईल.

(३) ३० मास्टर ट्रेनर्सची अंगणवाडी प्रशिक्षण केंद्र, आरोग्य आणि कल्याण प्रशिक्षण केंद्र अशा शासनाच्या विविध संस्थांमधून निवड करण्यात येईल. काही सामाजिक संस्थेमधूनही मास्टर ट्रेनर्सची निवड करण्यात येईल.

(४) मास्टर ट्रेनर्सचे प्रशिक्षण राजमाता जिजाऊ माता आणि बाल आरोग्य आणि पोषण मिशन यांच्यामार्फत आयोजित करण्यात येईल.

**ब) आश्रम शाळेतील शिक्षकांचे प्रशिक्षण :**

(१) प्रत्येक आश्रम शाळेतून ६ शिक्षकांना (३ पुरुष आणि ३ महिला) प्रशिक्षण देण्यात येईल.

(२) २ मास्टर ट्रेनर्स मार्फत २ शिक्षकांच्या (१ पुरुष आणि १ महिला) गटाला प्रशिक्षण देण्यात येईल

(३) प्रत्येकी दोन दिवसांच्या ३ सत्रांमध्ये प्रशिक्षण देण्यात येईल.

(४) ह्या सत्रांची ३ भागांमध्ये विभागणी केली आहे, प्रत्येक सत्रामध्ये विशिष्ट विषय हाताळला जाईल (प्रत्येक भागासाठी १० आठवडे).

(५) पहिला भाग पूर्ण झाल्यावर दुसरा भाग सुरु करण्यात येईल (१० आठवडे).

(६) दुसरा भाग पूर्ण झाल्यावर तिसरा भाग सुरु करण्यात येईल (१० आठवडे).

**क) विद्यार्थांचे प्रशिक्षण:**

(१) प्रशिक्षणात सहभागी शिक्षक सहावी ते बारावी पर्यंतच्या मुलांना साप्ताहिक सत्रामध्ये प्रशिक्षण देतील.

(२) वर नमूद केलेल्या १० आठवड्याच्या कॅलेंडरनुसार १० साप्ताहिक सत्रांमध्ये प्रत्येक भाग पूर्ण करण्यात येईल.

६. **प्रशिक्षण प्रणाली:** सदरचे प्रशिक्षण अभ्यासक्रमानुसार ५ दिवसांच्या विविध सत्रामध्ये देण्यात येईल. ज्यामध्ये आरोग्य, पोषण, स्वच्छता, वयात येणे आणि जीवन कौशल्य इत्यादी विषय शिकविण्यात येतील.

७. **प्रशिक्षणाचे नियोजन:-** सदर प्रशिक्षणाचे नियोजन खालीलप्रमाणे करण्यात आले आहे.

(१) **मास्टर ट्रेनर्स:** पब्लिक हेल्थ इन्स्टिट्यूट, नागपूर येथे ५ दिवसांचे प्रशिक्षण देण्यात येईल.

(२) **शिक्षकांचे प्रशिक्षण एकाच वेळी ७ ठिकाणी** - पब्लिक हेल्थ इन्स्टिट्यूट, नागपूर, आरोग्य खात्याचे पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती आणि नाशिक येथील आरोग्य आणि कुटुंब कल्याण केंद्र येथे निवडक शिक्षकांना प्रशिक्षण देण्यात येईल.

शिक्षकांसाठीच्या प्रशिक्षणामध्ये काही कालावधीचे अंतर ठेवण्यात आले आहे, ज्यामुळे त्यांच्या प्रशिक्षणाशी निगडीत समस्यांचे निवारण करणे आणि त्यांना प्रशिक्षण देताना आलेल्या अनुभवांचे संकलन करणे शक्य होईल.

(३) **विद्यार्थी**:- विद्यार्थ्यांकरिता ३० सत्र प्रत्येकी १० सत्रांच्या भागांमध्ये विभागित करून आश्रमशाळेत प्रशिक्षण देण्यात येतील.

८. **प्रशिक्षण साधन सामग्री:** शिक्षक आणि पौगंडावस्थेतील मुले यांच्या प्रशिक्षणाकरिता लागणारी मराठी भाषेतील पुस्तिका आणि इतर साधने राजमाता जिजाऊ माता आणि बाल आरोग्य आणि पोषण मिशन यांनी युनिसेफ च्या सहकार्याने विकसित केली आहेत. प्रशिक्षणाची साधन सामग्रीची चाचणी २१ शिक्षक आणि १६ विद्यार्थ्यी यांचे, खारघर येथे ५ दिवसांच्या प्रशिक्षणा दरम्यान करण्यात आली आहे. प्रशिक्षण साधन सामग्रीमध्ये मार्गदर्शक पुस्तिका, FAQ पुस्तिका आणि पौगंडावस्था, पोषण व आरोग्य, आरोग्याविषयीचे समज आणि कौशल्य इत्यादी समाविष्ट केले आहे. आश्रमशाळामध्ये जीवन कौशल्य शिक्षण कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी प्रमाण राहील. तरी कार्यक्रम राबिवताना सुधारणा आणि कल्पकतेसाठी बदल करण्यात येतील. प्रशिक्षणा दरम्यान आलेले अनुभव कार्यक्रमाच्या सबलीकरणासाठी आणि सुधारणेसाठी समाविष्ट करण्यात येतील.

९. **राज्यातील शासकीय आश्रमशाळा,एकलव्य निवासीशाळा व प्रशिक्षण द्यावयाच्या शिक्षकांची अपर आयुक्तनिहाय माहिती खालील तक्यात दिली आहे**. प्रत्येक आश्रमशाळेतील ६ शिक्षकांना प्रशिक्षण देण्यात येईल. एका गटात (बॅच)३० प्रशिक्षणांर्थींचा समावेश असेल.

| अ. क्र. | अपर आयुक्त | समाविष्ट जिल्हे | शासकीय आश्रमशाळांची संख्या | प्रशिक्षण द्यावयाच्या शिक्षकांची संख्या (प्रतिशाळा ६ शिक्षक) | प्रशिक्षणार्थींचे गट (३० प्रशिक्षणार्थी / गट) | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | नागपूर | नागपूर, वर्धा, भंडारा, गडचिरोली, चंद्रपूर, गोंदीया | ९० | ५४० | १८ | सदरचे प्रशिक्षण ३ भागामध्ये प्रत्येक महिन्याला एक भाग याप्रमाणे करण्यात येईल. |
| २ | अमरावती | नागपूर, वर्धा, भंडारा, गडचिरोली, चंद्रपूर, गोंदीया | ८९ | ५३४ | १८ | |
| ३ | ठाणे | ठाणे, पालघर, पुणे, रायगड, रत्नागिरी | १२८ | ७६८ | २६ | |
| ४ | नाशिक | नाशिक, धुळे, नंदूरबार, जळगाव, अहमदनगर | २२२ | १३३२ | ४४ | |
| ५ | एकलव्य शाळा | ----- | १४ | ८४ | ३ | |
| | **एकूण** | | **५४३** | **३२५८** | **१०९** | |

**१०. प्रशिक्षण खर्च व आर्थिक तरतूद:** - प्रशिक्षणा दरम्यान येणारा राहण्याचा, सुविधा केंद्राचा, साधनसामग्री, संसाधने, पुस्तकांची छपाई, प्रशिक्षणार्थी आणि सहभागी व्यक्तींचा दिवसाचा आणि प्रवास भत्ता इत्यादी खर्च आदिवासी विकास विभाग करेल. प्रशिक्षणासाठी खालीलप्रमाणे खर्च अपेक्षित आहे. रु. ७०,७००/- इतका खर्च प्रत्येक ३० सहभागी व्यक्तींच्या एका प्रशिक्षणासाठी एका तिमाहीत अपेक्षित आहे.

| जेवण व राहण्याचा खर्च (रु.७००) प्रति प्रशिक्षणार्थी/प्रति दिन | स्टेशनरी रु. २५० प्रति प्रशिक्षणार्थी | मास्टर ट्रेनरसाठी मानधन रु. १००० प्रतिदिन व बॅच को-ऑर्डीनेटर मानधन रु. ५००/ प्रती बॅच | बॅच को-ऑर्डीनेटर व मास्टर ट्रेनरसाठी प्रवास भत्ता रु. ५०० प्रति बॅच | प्रवासभत्ता प्रति प्रशिक्षणार्थी रु. ३०० प्रमाणे | इतर खर्च व आकस्मिक खर्च रु. २०० प्रति बॅच | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| प्रशिक्षणार्थी ३०x७००x२= रु. ४२,००० | --- | --- | ३०x३००= रु.९,००० | --- | --- | --- |
| दोन मास्टर ट्रेनर व एक बॅच को-ऑर्डीनेटर ३०x७००x२= रु.४२,००० | --- | मास्टर ट्रेनर २x१०००x२= रु.४,००० समन्वयक रु. ५००/- बॅच | मास्टर ट्रेनर व बॅच समन्वयक ३x५००/ प्रति बॅच रु.४,००० रु. १५००/- | --- | आकस्मिक खर्च रु.२,०००/- | --- |
| **एकूण** | **रू. ४६,२००** | **रु. ७,५००** | **रु. ४,५००** | **रु.१,५००** | **रु. ६,०००** | **रु. ७०,७००** |

**सर्व अपर आयुक्तालय क्षेत्रातील सर्व शासकीय आश्रमशाळांमधील कर्मचाऱ्यांच्या प्रशिक्षणावरील खर्च खालीलप्रमाणे आहे.**

| अपर आयुक्त | एकूण आश्रमशाळा | प्रशिक्षण द्यावयाचे शिक्षक संख्या | एकूण बॅचेस (प्रती बॅच ३० प्रशिक्षणार्थी याप्रमाणे | एका टप्प्यात प्रशिक्षणार्थीचे खर्चानुसार एकूण खर्च | एका वर्षात (२०१७-१८) ३ टप्प्यांचे प्रशिक्षणा-साठी खर्च | प्रशिक्षणाचा एकूण खर्च |
|---|---|---|---|---|---|---|
| ठाणे | १२८ | ७६८ | २६ | १८,३८,२०० | ७८ | ५५,१४,५०० |
| नाशिक | २२२ | १३३२ | ४४ | ३१,१०,८०० | १३२ | ९३,३२,४०० |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| अमरावती | ८९ | ५३४ | १८ | १२,७२,६०० | ५४ | ३८१७,८०० |
| नागपूर | ९० | ५४० | १८ | १२,७२,६०० | ५४ | ३८,१७,८०० |
| एकलव्य शाळा | १८ | ८४ | ३ | २,१२,१०० | ९ | ६,३६,३०० |
| **एकूण** | **५४३** | **३२५८** | **१०९** | **७७,०६,३००** | **३२७** | **२,३१,१८,९००** |

प्रशिक्षणासाठी ३२५८ सहभागी व्यक्तींच्या १०९ वर्गाचा एका तिमाहीचा खर्च रु. ७७.०७ लाख इतका अपेक्षित आहे. त्याचप्रमाणे ३२५८ सहभागी व्यक्तींच्या १०९ वर्गाचा तीन तिमाहीचा खर्च रु. २३१.१८ लाख इतका अपेक्षित आहे.

**११. प्रशिक्षण सुविधा:** - प्रशिक्षण केंद्र व त्याअंतर्गत जिल्हानिहाय येणारी आश्रमशाळांची संख्या खालीलप्रमाणे आहे.

| अ . क्र. | HFWTC प्रशिक्षण केंद्र | प्रशिक्षण केंद्रातंर्गत समाविष्ट जिल्हे | जिल्हयातील आश्रमशाळांची संख्या | एक जिल्हयात प्रशिक्षण द्यावयाचे शिक्षकांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | ठाणे | ठाणे, पालघर | ठाणे -२३<br>पालघर -६३<br>**एकूण -८६** | ठाणे- १३८<br>पालघर- ३७८<br>**एकूण- ५१६** |
| २ | पुणे | पुणें, कोल्हापूर, सातारा, सोलापूर,रायगड, अहमदनगर, उस्मानाबाद | पुणें, कोल्हापूर, सातारा- २३<br>सोलापूर, उस्मानाबाद- ३<br>रायगड- १६<br>अहमदनगर- २५<br>**एकूण- ६७** | पुणें, कोल्हापूर, सातारा- १३८<br>सोलापूर, उस्मानाबाद- १८<br>रायगड- ९६<br>अहमदनगर- १५०<br>**एकूण- ४०२** |
| ३ | नाशिक | नाशिक, नंदूरबार | नाशिक- ८२<br>नंदूरबार- ७५<br>**एकूण - १५७** | नाशिक- ४९२<br>नंदूरबार- ४५०<br>**एकूण - ९४२** |
| ४ | औरंगाबाद | औरंगाबाद, बीड, जळगाव, धुळे | औरंगाबाद, बीड- ८<br>जळगाव- १८<br>धुळे- २२<br>**एकूण- ४८** | औरंगाबाद, बीड- ४८<br>जळगाव- १०८<br>धुळे- १३२<br>**एकूण -२८८** |
| ५ | नागपूर | भंडारा, गोंदीया, गडचिरोली | भंडारा, गोंदीया- १५<br>गडचिरोली- ४४<br>**एकूण- ५९** | भंडारा, गोंदीया- ९०<br>गडचिरोली- २६४<br>**एकूण- ३५४** |
| ६ | अमरावती | अमरावती, अकोला, वाशिम, बुलढाणा, नांदेड, हिंगोली, यवतमाळ | अमरावती- २१<br>अकोला,वाशिम, बुलढाणा-८<br>नांदेड- १७<br>हिंगोली- ५<br>यवतमाळ- ३०<br>**एकूण- ८१** | अमरावती- १२६<br>अकोला,वाशिम,बुलढाणा- ४८<br>नांदेड- १०२<br>हिंगोली- ३०<br>यवतमाळ- १८०<br>**एकूण- ४८६** |
| ७ | PHI नागपूर | नागपूर,वर्धा,चंद्रपूर, एकलव्य निवासी शाळा | नागपूर,वर्धा- १३<br>चंद्रपूर- १८<br>एकलव्य निवासी शाळा- १४<br>**एकूण- ४५** | नागपूर,वर्धा- ७८<br>चंद्रपूर- १०८<br>एकलव्य निवासी शाळा- ८४<br>**एकूण- २७०** |
| | | | **एकूण- ५४३** | **एकूण- ३२५८** |

वरील तक्त्यात अपर आयुक्त कार्यक्षेत्रातील जिल्हे दाखवण्यात आले आहेत. नागपूर आणि अमरावती मध्ये प्रत्येकी ४ जिल्हे आणि नाशिक मधून ६ जिल्हे घेण्यात आले आहेत. आदिवासी जिल्ह्यांची विभागणी आरोग्य खात्याचे आरोग्य आणि कुटुंब कल्याण केंद्र लक्षात घेऊन करण्यात आले आहे. आरोग्य आणि कुटुंब कल्याण केंद्रापासूनचे अंतर लक्षात घेऊन तीन जिल्हे प्रत्येकी एक केंद्र अशी विभागणी करण्यात आली आहे.

**१२. प्रशिक्षण कालावधी:-** मास्टर ट्रेनर्ससाठीचे प्रशिक्षण मे २०१७ च्या मध्ये किंवा महिनाअखेरलाकरण्यात येईल. शिक्षकांचे प्रशिक्षण जुन २०१७ च्या पहिल्या आठवड्यापासून सुरु करण्यात येईल.

**१३. प्रशिक्षण कार्यक्रमाचा आढावा:-** आदिवासी विकास विभाग, महाराष्ट्र शासन, राजमाता जिजाऊ माता आणि बाल आरोग्य आणि पोषण मिशन, सामाजिक आरोग्य विभाग, युनिसेफ आणि सलग्न अधिकारी संयुक्तरीत्या दर तिमाही नंतर कार्यक्रमाचा आढावा घेतील.त्यावेळी आर्थिक तरतुदींचाचाही आढावा घेतला जाईल.

**१४. विविध विभागांच्या जबाबदाऱ्या:-** विविध विभागाच्या जबाबदा-या खालीलप्रमाणे राहतील.

**सार्वजनिक आरोग्य विभाग**: प्रशिक्षणासाठी सुविधा पुरविणे (राज्यातील ०६ HFWTC आणि पब्लिक हेल्थ इन्स्टिटयूट, नागपूर) आणि HFWTC मधून मास्टर ट्रेनर्स नेमणे.

**महीला व बाल विकास विभाग**: AWTC आणि MLTC मधून नेऊन दिलेले ट्रेनर्स आणि SABLA अंतर्गत प्रशिक्षण घेतलेले पर्यवेक्षक मास्टर ट्रेनर्स म्हणून पुरवणे.

**राजमाता जिजाऊ माता आणि बाल आरोग्य आणि पोषण मिशन:**

१) मुलां-मुलींसाठीची प्रशिक्षण साधने तयार करणे आणि त्यांची चाचणी करणे. प्रशिक्षणा करिता लागणारी पुस्तिका आणि इतर साधने राजमाता जिजाऊ माता आणि बाल आरोग्य आणि पोषण मिशन यांनी युनिसेफ च्या सहकार्याने विकसित केली आहेत. प्रशिक्षणाची साधन सामग्रीची चाचणी २१ शिक्षक आणि १६ विद्यार्थ्यांबरोबर पालघर येथे युवा सेंटर, खारघर नियोजित ५ दिवसांच्या प्रशिक्षानादरम्यान करण्यात आली आहे.

२) मास्टर ट्रेनर्सची शासनच्या विविध संस्थांमधून आणि सामाजिक संस्थेमधून निवड करणे.

३) राज्यस्तरीय संसाधन गटामार्फत मास्टर ट्रेनर्सचे प्रशिक्षण करणे.

४) पब्लिक हेल्थ इन्स्टिटयूट आणि आरोग्य खात्याचे आरोग्य आणि कुटुंब कल्याण केंद्र याच्या सहयोगाने शिक्षकांचे प्रशिक्षण करणे.

५) कार्यक्रमाचे मुल्यांकन करण्याकरिता संस्थेची निवड करणे.

**आदिवासी विकास विभाग**:

१) आर्थिक तरतूद करणे.
२) शिक्षकांना प्रशिक्षणासाठी पाठवणे.
३) प्रशिक्षण सत्रांची देखरेख आणि पर्यावेक्षण करणे, उदा.: वेळेवर प्रशिक्षणाचे आयोजन.

**युनिसेफ:**

१) प्रशिक्षणा करिता लागणारी पुस्तिका आणि मार्गदर्शक पुस्तिका युनिसेफ च्या सहकार्याने विकसित केली आहेत.

२) युनिसेफ मास्टर ट्रेनर्स च्या प्रशिक्षणासाठी हातभार लावेल.

३) प्रशिक्षण कार्यक्रमाच्या मूल्यांकनासाठी पुढाकार घेणे.

**१५. मूल्यमापन समिती:-** प्रशिक्षण कार्यक्रमाच्या मूल्यांकनासाठी समिती आदिवासी विकास विभागाकडून गठीत करण्यात येईल.सदर समिती खालीलप्रमाणे असेल. कार्यक्रमाचा आढावा घेण्याकरता समितीची तिमाही बैठक घेईल.

| | |
|---|---|
| १) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक | अध्यक्ष |
| २) सर्व अपर आयुक्त ,आदिवासी विकास | सदस्य |
| ३) आदिवासी विकास विभागाचे मंत्रालयातील प्रतिनिधी | सदस्य |
| ४) युनिसेफचे प्रतिनिधी | सदस्य |
| ५) सामाजिक संस्थांचे प्रतिनिधी | सदस्य |

**१६. देखरेख आणि मुल्यांकन:** दर महिन्याला कार्यक्रमाच्या प्रगतीचा अहवाल प्रत्येक शाळेमार्फत घेतला जाईल. या अहवालाच्या आधारावर प्रशिक्षणाचे मुल्यांकन प्रकल्प अधिकारी,करतील. प्रकल्प कार्यालयांचे एकत्रित अहवाल अपर आयुक्तांमार्फत आदिवासी आयुक्तालयास सादर केले जाईल. बाह्य संस्थेमार्फत आश्रमशाळेतील मुलांच्या प्रशिक्षणाचे तिमाही मुल्यांकन करण्यात येईल. मुल्यांकनासाठी संस्थेची नेमणूक युनिसेफ द्वारा केली जाईल. नेमणूक केलेली संस्था तिहामाहीस प्रगतीचा अहवाल मुल्यांकन समितीच्या बैठकीत सादर करेल.

१७. सदर प्रशिक्षण कार्यक्रमावरील खर्च मागणी क्र. टी-५ (०१)(६०) आश्रमशाळा समुह योजना, (२२२५ डी ७३४) या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

१८. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र २०१७०१११६१११३५०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2017.01.11 16:15:43 +05'30'

( सु. ना. शिंदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२
३. मा. मंत्री ( आदिवासी विकास ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

४. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबईः- ४०० ०३२
५. सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबईः- ४०० ०३२.
६. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबईः- ४०० ०३२.
७. सचिव , (आदिवासी विकास विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबईः- ०३२.
८. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
९. अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नाशिक / अमरावती / नागपूर.
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
११. सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( महिला व बाल विकास ), जिल्हा परिषद.
१२. सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
१३. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१४. महालेखापाल (लेखा परिक्षा), / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मंबई .
१५. महालेखापाल (लेखा परिक्षा), / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- २, नागपूर.
१६. सर्व सह सचिव / उप सचिव/अवर सचिव / कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१७. निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.